राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेनुसार
नियोजन (खुद्द) विभागाचा वाहन आढावा

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - वाहन १३२३/प्र.क्र.११/का.१४२३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-२५ जून, २०२४

**संदर्भ** :- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. वाहन १०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दिनांक १०.०९.२००१
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. वाहन-२०१०/प्र.क्र.५०/१०/विनियम, दिनांक १०.०१.२०११
३) वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.४३०/२०२३/विनियम, दिनांक १०.११.२०२३

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाने संदर्भ क्र.१ व २ अन्वये शासकीय व इतर कार्यालयांमध्ये वाहनांच्या वापराबाबतचे धोरण निश्चित केले आहे. त्यामध्ये सर्व प्रशासकीय विभागांनी (खुद्द) व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांतील वाहनांचा वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयानुसार आढावा घेण्याबाबत निर्देश दिले आहेत. त्यास अनुसरुन नियोजन विभाग (खुद्द) कडील वाहनांचा आढावा मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेस्तव सादर करण्यात आला होता.

सदर प्रस्तावास संदर्भ क्र.३ अन्वये राज्यस्तरीय वाहन आढावा समितीची मान्यता प्राप्त झाली आहे. यास अनुसरुन याबाबतचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने दिलेल्या मान्यतेनुसार नियोजन विभाग (खुद्द) करीता एकूण ३ वाहने अनुज्ञेय आहेत. त्यानुषंगाने या शासन निर्णयान्वये, नियोजन विभाग (खुद्द) चा वाहन आढावा खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | वाहन अभिहस्तांकित पदाधिकारी/अधिकारी यांचा तपशील | अनुज्ञेय वाहनांची संख्या |
|---|---|---|
| १ | मा. मंत्री, नियोजन | १ |
| २ | अ.मु.स./प्र.स./सचिव व विकास आयुक्त, नियोजन विभाग | १ |
| ३ | स्टाफ कार | १ |
| **एकूण** | | **३** |

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४३०/२०२३/विनियम, दिनांक १०.११.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०६२५१६५८२९३२१६ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA
SHANTARAM PUJARI

Digitally signed by MAHENDRA SHANTARAM PUJARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=16153bd1d85632a421d5a5fd23bf5e5bb624d27f2c8cf59fb17e3ead3a034dbc, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=404B91F6EB1B1FEEADD0E630B486F2FF22C7073CCB93D334F083CEAEFA447C09, cn=MAHENDRA SHANTARAM PUJARI
Date: 2024.06.25 17:09:24 +05'30'

**( म. शां. पुजारी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग तथा अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती, मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (प्र.सु. व र. व का.), सामान्य प्रशासन विभाग तथा सदस्य, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती, मंत्रालय, मुंबई
३) परिवहन आयुक्त तथा सदस्य सचिव, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती
४) महालेखाकार-१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
५) अधिदान व लेखा अधिकारी , मुंबई
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७) सह/उप सचिव (कार्या.१४२१/१४२२/१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
९) वित्त विभाग (कार्या. विनियम/व्यय-८), मंत्रालय, मुंबई
१०) निवड नस्ती, कार्यासन-१४२३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई